**महाराष्ट्र शैक्षणिक संस्था (अध्यापक संवर्गातील आरक्षण) अधिनियम, २०२१ नुसार राज्यातील अकृषि विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालये/ संस्थांमधील शिक्षकीय पदांच्या संवर्गनिहाय आरक्षण धोरणाच्या अंमलबजावणीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१९/प्र.क्र.९४/१९/विशि-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ११ एप्रिल, २०२२.

**संदर्भ**:-

१) उच्च व तंत्र शिक्षण आणि सेवायोजन विभाग, शासन निर्णय क्र.एजीसी-१४९४/ (२९९१)/विशि-४, दि.२४.०४.१९९५.
२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.२०१३/(४४७/१३)/विशि-१,दि.२२.०१.२०१४.
३) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.न्यायाप्र-२०१४/ (प्र.क्र.३२१/१४)/विशि-१, दि.१०.०४.२०१५ व दि.२४.०८.२०१५.
४) विधि व न्याय मंत्रालय, भारत सरकार यांचा The Central Educational Institutions (Reservation in Teachers Cadre) Act, २०१९.
५) महाराष्ट्र शैक्षणिक संस्था (अध्यापक संवर्गातील आरक्षण) अधिनियम, २०२१.
६) सामान्य प्रशासन विभाग, शासन अधिसूचना क्र.बीसीसी-२०२१/प्र.क्र.८५८/१६-ब, दि.०१.०४.२०२२.
७) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन अधिसूचना समक्रमांक दि.०७.०४.२०२२.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने The Central Educational Institutions (Reservation in Teachers Cadre) Act, २०१९ अन्वये केंद्रीय विद्यापीठे व केंद्रीय शैक्षणिक संस्थांमधील शिक्षकीय पदांच्या सरळसेवा भरतीमध्ये संवर्गनिहाय आरक्षण धोरण लागू केलेले आहे. राज्यातील शैक्षणिक संस्थांमधील अध्यापक संवर्गातील सरळसेवा भरतीमधील विद्यमान आरक्षण धोरणानुसार, संबंधित अध्यापक संवर्गामध्ये विषयनिहाय आरक्षण लागू आहे. विषयनिहाय संवर्गाच्या लहान आकारामुळे सर्व आरक्षित प्रवर्गांना अध्यापक संवर्गामध्ये पर्याप्त प्रतिनिधित्व मिळत नाही. तसेच काही प्रकरणांमध्ये जेथे विषयनिहाय एकल पद आहे, तेथे आरक्षण लागू होत नाही. त्यानुषंगाने केंद्र शासनाचे सदर संवर्गनिहाय आरक्षण धोरण राज्यात लागू करण्याकरीता लोकप्रतिनिधी तसेच अनेक संघटनांकडून विविध निवेदने राज्य शासनास प्राप्त झाली आहेत.

या पार्श्वभूमीवर केंद्र शासनाने विहित केलेल्या संवर्गनिहाय आरक्षण धोरणाची राज्यात अंमलबजावणी करताना त्यांचा संबंध उच्च व तंत्र शिक्षण विभाग, कृषि विभाग, वैद्यकीय शिक्षण विभाग, शालेय शिक्षण विभाग, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांच्या अधिपत्याखालील

महाविद्यालयातील शिक्षकीय पदांच्या सरळसेवा भरतीमध्ये येणार असल्याने केंद्र शासनाने विहित केलेले संवर्गनिहाय आरक्षण धोरण, राज्य शासनाचे प्रचलित आरक्षण धोरण तसेच यासंदर्भातील मा. न्यायालयाचे न्यायनिर्णय यांचा अभ्यास करून केंद्र शासनाने विहित केलेल्या संवर्गनिहाय आरक्षण धोरणाची राज्यातील शैक्षणिक संस्थांमध्ये अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने शासनास शिफारस करण्यासाठी मंत्रिमंडळ उपसमिती गठित करण्यात आली होती. सदर समितीची बैठक दि.२४.१२.२०२१ रोजी पार पडली. सदर बैठकीमध्ये प्रस्तुत संवर्गनिहाय आरक्षण राज्यातील शैक्षणिक संस्थांना लागू करण्याचा निर्णय घेण्यात आला. तसेच त्यानुषंगाने याबाबतचा अधिनियम राज्य विधिमंडळाच्या सन २०२१ च्या हिवाळी अधिवेशनामध्ये पारित करण्यात आला आहे. तसेच सदर अधिनियम दि.०१.०४.२०२२ पासून राज्यात लागू करण्यात आला आहे. त्यानुसार राज्यातील अकृषि विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालये/ संस्थांमधील शिक्षकीय पदांच्या सरळसेवा भरतीमध्ये सदर संवर्गनिहाय आरक्षण धोरण शासन अधिसूचना दि.०७.०४.२०२२ अन्वये लागू केले आहे. त्यानुषंगाने सदर आरक्षण धोरणाच्या अंमलबजावणीबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

राज्यातील अकृषि विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालये/ संस्थांमधील शिक्षकीय पदांच्या सरळसेवा भरतीमधील संवर्गनिहाय आरक्षण धोरणाच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना देण्यात येत आहेत :-

**अ) संवर्गनिहाय आरक्षणाची परिगणना :-**

१) शासन अधिसूचना दि.०७.०४.२०२२ मध्ये विहित केलेल्या तरतुदीनुसार प्रत्येक विद्यापीठातील तसेच एकाच व्यवस्थापनाच्या नियंत्रणाखालील सर्व महाविद्यालयांतील अध्यापक संवर्गांतील (समान वेतनश्रेणीतील) सर्व विषयांतील मंजुर पदे एकत्रित करण्यात यावीत.

२) संवर्गनिहाय आरक्षण हे संवर्गातील एकुण मंजूर पदांची संख्या विचारात घेऊन प्रचलित आरक्षण धोरणातील विहित टक्केवारीनुसार निश्चित करण्यात यावे. तसेच समांतर आरक्षणासंदर्भात शासनाच्या प्रचलित आदेशानुसार कार्यवाही करण्यात यावी.

३) संवर्गातील एकूण मंजूर पदे व कार्यरत पदे विचारात घेऊन संवर्गाची बिंदुनामावली पदांच्या गोषवाऱ्यासह विहित नमुन्यात ठेवण्यात यावी. तद्नंतर महाराष्ट्र शैक्षणिक संस्था (अध्यापक संवर्गातील आरक्षण) अधिनियम, २०२१ नुसार संवर्गनिहाय आरक्षण हे संवर्गातील एकुण मंजूर पदांच्या संख्येस लागू होणार असल्याने त्याप्रमाणे बिंदुनामावलीची तपासणी करुन शासन निर्णय दि.१८.१०.१९९७ मधील तरतुदीनुसार रिक्त पदांचे प्रवर्गनिहाय आरक्षण निश्चित करण्यात यावे व सदर बिंदुनामावलीस सक्षम प्राधिकरणाची मान्यता घेणे बंधनकारक राहील.

**ब) संवर्गनिहाय आरक्षण धोरणानुसार भरतीप्रक्रिया राबविण्याबाबत :-**

१) वरीलप्रमाणे रिक्त पदांचे प्रवर्गनिहाय आरक्षण निश्चित होऊन बिंदुनामावली अंतिम झाल्यावर त्यानुसार रिक्त पदे भरण्यासाठी शासनाच्या प्रचलित कार्यपध्दतीचा अवलंब करून जाहिरात प्रसिध्द करण्यात यावी.

२) सदर जाहिरातीमध्ये भरती करावयाच्या रिक्त पदांची प्रवर्गनिहाय पदसंख्या दर्शविण्यात यावी.

३) तसेच सदर जाहिरातीमध्ये कोणत्या विषयाची किती रिक्त पदे भरावयाची आहेत याची देखील एकूण संख्या दर्शविण्यात यावी.

४) सदर जाहिरातीच्या अनुषंगाने जाहिरातीत नमूद केलेल्या प्रवर्गांची पदे तसेच रिक्त पदांचे विषय विचारात घेऊन त्यानुसार पात्र असलेले सर्व उमेदवार अर्ज करू शकतील.

५) वरीलप्रमाणे अर्ज प्राप्त झाल्यानंतर निवड प्रक्रियेबाबत प्रचलित कार्यपध्दतीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

**क) संवर्गनिहाय आरक्षण धोरणाची अंमलबजावणी करण्याबाबतची कार्यपध्दती :-**

**(नमुना उदाहरणासह )**

**उदा.** सहायक प्राध्यापक संवर्गात मंजूर असलेल्या एकूण ३० पदांपैकी १५ पदे कार्यरत असून १५ पदे रिक्त आहेत. सदर १५ रिक्त पदांपैकी १० पदे प्रत्यक्षात भरावयाची असून त्याबाबतचा तपशील खालीलप्रमाणे आहे :-

| **प्रवर्ग** | अनु. जाती (१३%) | अनु. जमाती (७%) | वि. जा (अ) (३%) | भ.ज. (ब) (२.५%) | भ.ज. (क) (३.५%) | भ.ज. (ड) (२%) | विमाप्र (२%) | इमाव (१९%) | ईडब्ल्यूएस (१०%) | अराखीव (३८%) | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **एकूण मंजूर पदे** | ४ | २ | १ | १ | १ | १ | १ | ६ | ३ | १० | ३० |
| **कार्यरत पदे** | २ | १ | ० | १ | १ | ० | १ | ५ | ० | ४ | १५ |
| **रिक्त पदे** | २ | १ | १ | ० | ० | १ | ० | १ | ३ | ६ | १५ |
| **रिक्त पदांपैकी प्रत्यक्ष भरावयाची पदे** | १ | १ | १ | ० | ० | ० | ० | १ | २ | ४ | १० |

(वि.जा. (अ), भ.ज. (ब), भ.ज. (क) व भ.ज. (ड) या प्रवर्गांचे आरक्षण स्वतंत्र आहे. हे आरक्षण अंतर्गत परिवर्तनीय असल्याने सदर प्रवर्गांपैकी एखाद्या प्रगर्वाचा उमेदवार उपलब्ध न झाल्यास प्रवर्गासाठीचे पद अदलाबदलीने भरता येते.)

१) भरती करावयाची विषयनिहाय पदे (उदा.) :-मराठी-०३, भूगोल-०२, गणित-०२, अर्थशास्त्र-०१, रसायनशास्त्र-०१, राज्यशास्त्र-०१.

२) गुणवत्ता यादी :-

| विषय व प्राप्त गुण / गुणवत्ता क्र. | मराठी | भूगोल | अर्थशास्त्र | रसायनशास्त्र | राज्यशास्त्र | गणित |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | **अराखीव - ९८ *** | **अनु. जाती- ९८.५ *** | इमाव- ९४ | **ईडब्ल्यूएस- ९७ #** | अराखीव - ९६ | **भज (क)- ९९ *** |
| २ | **इमाव- ९७ @** | **ईडब्ल्यूएस- ९६ #** | अराखीव - ९३ | अनु. जमाती- ८८ | अनु. जाती- ९५ | **अनु. जमाती- ९८ *** |
| ३ | **अनु. जाती- ९६ ~** | इमाव- ९५ | अनु. जाती- ९१ | अराखीव - ८७ | ईडब्ल्यूएस- ९३ | ईडब्ल्यूएस- ९६ |
| ४ | अराखीव - ९५ | अनु. जमाती- ९४ | इमाव- ९० | अनु. जमाती- ८२ | इमाव- ९१ | अराखीव - ९५ |
| ५ | इमाव- ९३ | अराखीव - ९२ | ईडब्ल्यूएस- ८८ | इमाव- ८१ | **वि.जा. (अ)- ९० $** | इमाव- ९३ |
| ६ | अराखीव - ९१ | वि.जा. (अ)- ८९ | अराखीव - ८५ | भज (क)- ८० | अराखीव - ८९ | अराखीव - ९० |
| ७ | ईडब्ल्यूएस- ९० | अराखीव - ८७ | **अनु.जमाती- ८३ &** | अराखीव - ७९ | अनु. जमाती- ८८ | इमाव- ८८ |
| - | - | - | - | - | - | - |
| - | - | - | - | - | - | - |

३) निवड प्रक्रियेबाबत प्रचलित कार्यपध्दतीनुसार कार्यवाही पूर्ण झाल्यानंतर उपरोक्तप्रमाणे विषयनिहाय गुणवत्ता यादी तयार करण्यात यावी व सदर गुणवत्ता यादीतील उमेदवाराचा गुणवत्ता क्रमांक/प्राप्त गुण व प्रवर्ग विचारात घेऊन तो ज्या विषयासाठी पात्र ठरेल त्या विषयाच्या रिक्त पदावर सदर उमेदवाराची निवड करण्यात यावी.

४) तथापि, अराखीव प्रवर्गातील पदावर गुणवत्तेवर निवड होणाऱ्या मागासवर्गीय उमेदवाराची आरक्षित पदावर गणना न करता त्यांची निवड अराखीव प्रवर्गात दर्शविण्यात यावी.

५) वरीलप्रमाणे भरती प्रक्रिया राबवून त्या-त्या प्रवर्गातील निवड केलेल्या उमेदवारास नियुक्ती आदेश देण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी.

६) उपरोक्त परिच्छेद "क" मधील अ.क्र.२ येथे नमुना उदाहरण म्हणून तयार करण्यात आलेल्या गुणवत्ता यादीनुसार प्रवर्गनिहाय अंतिम निवड यादी खालीलप्रमाणे असेल :-

| **अराखीव -४** | |
|---|---|
| **अ.क्र.** | **विषय व प्राप्त गुण** |
| १ | गणित-९९ (भ.ज.-क)* |
| २ | भूगोल-९८.५ (अ.जा.)* |
| ३ | मराठी-९८ (अराखीव)* |
| ४ | गणित-९८ (अ.ज.)* |
| **इडब्ल्यूएस-२** | |
| १ | रसायनशास्त्र-९७ # |
| २ | भूगोल- ९६ # |
| **इमाव-१** | |
| १ | मराठी-९७ @ |
| **वि.जा. (अ) -१** | |
| १ | राज्यशास्त्र-९० $ |
| **अनु. जाती-१** | |
| १ | मराठी-९६ ~ |
| **अनु. जमाती-१** | |
| १ | अर्थशास्त्र-८३ & |

**ड)** आरक्षण धोरणातील बदलामुळे काही प्रवर्गातील पदे अतिरिक्त ठरण्याची शक्यता आहे. अशा प्रवर्गामध्ये सद्य:स्थितीत पद भरती करताना कोणत्याही संवर्गात कोणत्याही परिस्थितीत अध्यापक अतिरिक्त ठरणार नाहीत, याची खबरदारी घ्यावी. अतिरिक्त ठरल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी संबंधित व्यवस्थापनाची राहील. आरक्षण धोरणातील बदलामुळे एखाद्या प्रवर्गात अतिरिक्त ठरलेले अध्यापक त्या-त्या प्रवर्गातील पदे रिक्त झाल्यावर त्याच प्रवर्गातील बिंदुवर दर्शविण्यात यावे.

२. सदरहू शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाने दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**३.** सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२२०४१११७३१४५५१०८ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER AND TECHNICAL DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=880d8eb755bcb4455fa360baaa8797820b6265d75275a72f9fa31977bfeff4c9, serialNumber=99eb928028df71ebdfcd2898e209d499192ad3899261fead42f7d38a3141ab69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2022.04.12 11:47:54 +05'30'

**( अजित बाविस्कर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्य मंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. अध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
४. मा. उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
५. मा. सभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
६. मा. उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
७. मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
८. मा. विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
९. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०.मा. कुलगुरू, सर्व अकृषि विद्यापीठे.
११.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
१२.महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.
१३.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर.
१४.महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-२, नागपूर.
१५.संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१६.संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१७.संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य,
१८. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण/तंत्र शिक्षण,
१९.कुलसचिव, सर्व अकृषि विद्यापीठे,
२०.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२१.मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२२.मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२३.सहसचिव/उपसचिव (मशि/तांशि) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
२४.सहसचिव (ई-शाखा) विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
२५.निवड नस्ती (विशि-१).

*****